**सार्वजनिक बांधकाम विभागातील रस्त्यांच्या दुरुस्ती व देखभालीची कामे करताना संगणकीकृत प्रणालीद्वारे कामे मंजूर करणे/देयके अदा करणे/सनियंत्रण करणे इ. बाबींबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएटी-०३/२०१५/प्र.क्र.६०/इमारती-२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : ३०/६/२०१५

**संदर्भ** :- १) शासन निर्णय क्र.सीएटी-१०८७/सीआर ९४/इमारत-२, दि.१४/०६/१९८९.
२) शासन पत्र क्र.आरएमआर-२००२/सीआर १०९-०/रस्ते-१, दि.४/०६/२००२.
३) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-१०९७/सीआर ६२२/इमारत-२, दि.२२/०८/२००५.
४) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२००७/प्र.क्र.२१९/रस्ते-१, दि.०९/१०/२००७.
५) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०११/प्र.क्र.४६७/रस्ते-१, दि.२१/११/२०११.

प्रस्तावना :-

सद्य:स्थितीत सार्वजनिक बांधकाम विभागातील रस्त्यांच्या दुरुस्ती व देखभालीची कामे करण्यासंदर्भात शासनाने उपरोक्त संदर्भाखाली दर्शविलेल्या शासन निर्णय/शासन परिपत्रके/शासन पत्राद्वारे मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. रस्त्यांच्या दुरुस्ती व देखभालीची कामे अ, ब, क, ड व इ या संवर्गात दुरुस्तीच्या प्रकारानुसार विभागण्यात आली असून 'अ' संवर्गातील कामे कार्यकारी अभियंता स्तरावर, 'ब' व 'क' संवर्गातील कामे शासन स्तरावर, 'ड' व 'इ' संवर्गातील कामे शासनाच्या मान्यतेने मुख्य अभियंता स्तरावर मंजूर करण्यात येतात. कामे मंजूर करताना प्रामुख्याने कामाचा प्राधान्यक्रम, रस्त्यावरील वाहतुक वर्दळ व रस्त्याची झालेली हानी इत्यादींचा विचार करुन जिल्ह्यासाठी उपलब्ध होणाऱ्या दुरुस्तीच्या कामांसाठीच्या निधीची व्याप्ती विचारात घेऊन निर्णय घेण्यात येतो.

क्षेत्रीय स्तरावर सदर कामे प्रस्तावित करताना तसेच कामाच्या मंजूरीनंतर कामे कार्यान्वयित करताना अनेक त्रुटी राहिल्याचे दिसून येते. यामध्ये प्रामुख्याने एकच काम दोन-तीन वेळेला मंजूर होणे, कमी प्राधान्याचे काम प्रस्तावित करुन मंजूर करुन घेणे, ज्या संवर्गासाठी निधी उपलब्ध झाला आहे त्या संवर्गातील कामांऐवजी अन्य संवर्गातील कामांसाठी सदर निधी सोयीनुसार वर्ग करणे इत्यादी बाबी दिसून येतात. तसेच प्राप्त होणाऱ्या निधीचा विचार न करता फार मोठ्या प्रमाणात मोठ्या रकमेचे कार्यक्रम मंजूर करण्यात येतात. यामुळे शासनावर मोठ्या प्रमाणात आर्थिक बोजा येऊन नविन कामे मंजूर करता येणे शक्य होत नाही. या बाबींमुळे रस्त्यांची दुरुस्ती आवश्यक त्याठिकाणी योग्य वेळी करणे शक्य न झाल्याने रस्ते क्षतीग्रस्त होऊन रस्त्यावरील वाहतुकीस अत्यंत त्रासदायक परिस्थितीस सामोरे जावे लागते असे दिसून येते.

२. जनहित याचिका क्र.२८/२०१० च्या अनुषंगाने न्यायालयाने शासनाने काही बाबी स्पष्ट करावयाच्या सूचना दिलेल्या आहेत. याच अनुषंगाने नागपूर कंत्राटदार असोसिएशन यांनी शासनस्तरावर काही सुधारणा करण्याबाबत न्यायालयास सूचविले आहे. यासंदर्भात रिट याचिका क्र. २८/२०१० संदर्भात न्यायालयाने दिलेल्या निर्देशाप्रमाणे शासनाच्या दिनांक २/१२/२०१४

रोजीच्या शासन निर्णयाद्वारे अभ्यासगटाची नियुक्ती केली आहे. या अभ्यासगटाचा अहवाल शासनास प्राप्त झाला आहे. या समितीने केलेल्या शिफारशीसंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील सर्व प्रादेशिक विभागाच्या मुख्य अभियंत्यांसोबत दिनांक १२/३/२०१५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये या शिफारशींवर सविस्तर विचारविनिमय करण्यात आला. बैठकीस उपस्थित सर्व मुख्य अभियंतांनी त्यांचे अभिप्राय बैठकीमध्ये नमूद केले. या बैठकीमध्ये सर्वानुमते समितीने केलेल्या शिफारशींमधील काही महत्त्वाच्या बाबींबाबत न्यायालयाच्या निर्देशांप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याचे ठरले. त्यास अनुसरुन अभ्यासगटाने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागामध्ये प्रचलित असलेल्या कार्यपध्दतीत काही सुधारणा करण्याबाबत शासनाने निर्णय घेतला आहे :-

**<u>शासन निर्णय</u>** :-

उपरोक्त परिस्थितीचा विचार करुन रस्ते दुरुस्ती व देखभालीची कामे मंजूर करणे तसेच कामांची देयके अदा करणे व कामांचे अभिलेख योग्य रितीने ठेवण्यासंदर्भात खालील प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

१. रस्त्यांचे दुरुस्ती व देखभालींचे कार्यक्रम मंजूर करण्यासाठी सर्व रस्त्यांची सविस्तर माहिती व रस्त्यांची हानी तसेच रस्त्यांसाठी करण्यात आलेल्या गेल्या ५ वर्षातील कामांची माहिती, रस्त्यावरील वाहतुक वर्दळ इत्यांदी बाबींबाबत प्रादेशिक स्तरावर संगणकीकृत माहिती संकलित करण्यात यावी.
२. सदर माहिती तयार करण्याची जबाबदारी कार्यकारी अभियंता यांची राहील. सदर माहिती योग्य असल्याची खात्री करुन त्याबाबत प्रमाणित करण्याची जबाबदारी अधिक्षक अभियंता यांची राहील. प्रादेशिक विभागाच्या मुख्य अभियंता यांनी सदर माहिती संगणकीकृत करुन संबंधितांना उपलब्ध करुन देण्याबाबत आवश्यक यंत्रणा निर्माण करावी.
३. रस्त्यांच्या दुरुस्ती व देखभालीचे कार्यक्रम मंजूर करणाऱ्या सक्षम अधिकाऱ्याने कार्यक्रम मंजूरी पुर्वी अशा संगणकीकृत (रस्त्यांच्या दुरुस्ती व देखभालीच्या कामांच्या) माहिती मधील तपशीलाची नोंद घेऊन व विहित नियमांचे पालन करुन नंतरच कार्यक्रम मंजूर करावा.
४. रस्त्यांच्या दुरुस्ती व देखभालीच्या कामांची व इतर कामांची देयके अदा करण्यापुर्वी सदर देयकातील तपशीलाची नोंद संगणकावर करुन रस्त्यांच्या दुरुस्ती व देखभालीच्या एकत्रित माहिती मध्ये नोंद घेतल्याशिवाय देयके अदा करण्यात येऊ नयेत. अशी बाब आढळल्यास त्यासाठी संबंधित कार्यकारी अभियंता हे वैयक्तिकरित्या जबाबदार असतील.

उपरोक्त सूचनांचे पालन क्षेत्रीय स्तरावरील सर्व अधिकाऱ्यांनी/कर्मचाऱ्यांनी करणे आवश्यक आहे. या सूचनांप्रमाणे कार्यवाही न करणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांच्या विरोधात उचित प्रशासकीय दंडनीय कार्यवाही करण्यात येईल याची नोंद घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०८०४१३३४४६७८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vidyadhar Dinkar Sardeshmukh

Digitally signed by Vidyadhar Dinkar Sardeshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vidyadhar Dinkar Sardeshmukh
Date: 2015.08.04 13:39:33 +05'30'

**( वि.दि.सरदेशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सर्व मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग
२. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, मुंबई
३. सर्व अधिक्षक अभियंता,सा.बां. मंडळ
४. सर्व कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग
५. सर्व मंत्रालयीन विभाग
६. स्वीय सहाय्यक, अपर मुख्य सचिव (सा.बां)/ सचिव (बांधकामे)/सचिव (रस्ते), सा.बां.विभाग, मुंबई
७. निवडनस्ती, इमारती-२ सा.बां.वि. मंत्रालय.